मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पासाठी सल्लागार म्हणून मे. पीडब्ल्युसी या कंपनीला मुदतवाढ देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
### शासन निर्णय क्रमांकः सीसीटी-३६१६/प्र.क्र.७६/भाग-८/ई-७४४०४६/पोल-३

दुसरा मजला, मंत्रालय,मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,मुंबई-४०००३२.

दिनांक: २६ मार्च, २०२५

वाचा :

१. माहिती व तंत्रज्ञान विभाग आणि मे. पीब्ल्यूसी कंपनी यांच्यामध्ये झालेला करार दि.१७.११.२००९.
२. शासन निर्णय, माहिती व तंत्रज्ञान विभाग क्र. GAD-मातंस ०८०/४/२०१४-०/० Directorate of IT-DIT (MH), दि.०१.०७.२०१४.
३. शासन निर्णय, गृह विभाग क्र. गृहआ-२०१५/प्र.क्र.२३०/आस्था-२, दि.२०.०५.२०१५.
४. शासन निर्णय, गृह विभाग क्र. सीसीटी-३६१५/प्र.क्र.९३/पोल-३, दि.२९.०५.२०१५.
५. शासन निर्णय, गृह विभाग क्र. सीसीटी-३६१६/प्र.क्र.७६/भाग-१/पोल-३, दि.२५.०७.२०१६, दि.२५.०७.२०१७, दि.१३.१२.२०१८, दि.१६.०८.२०१९, दि.२१.०१.२०२०, दि.०२.०७.२०२०, दि.२८.०४.२०२१, दि.३०.३.२०२२, दि.२२.११.२०२२, व दि.१२.३.२०२४
६. शासन निर्णय, माहिती व तंत्रज्ञान विभाग क्र. GAD-मातंस ०८०/४/२०१४-०/० Directorate of IT-DIT (MH), दि.५.१०.२०२३
७. गृह विभाग, उच्च स्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या (HPC) दि.१३.२.२०२५ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त पत्र दि.३.३.२०२५

प्रस्तावना :

गृह विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पासंदर्भात सल्लागाराच्या कामकाजासाठी मे. पीडब्ल्युसी या कंपनीची माहिती व तंत्रज्ञान विभागामार्फत दि.१७.११.२००९ रोजीच्या करारान्वये नेमणुक करण्यात आली होती, सदर कंपनीला शासन निर्णय, गृह विभाग दि.२९.०५.२०१५ अन्वये दि.३०.०४.२०१६ पर्यंत, शासन निर्णय, गृह विभाग दि.२५.०७.२०१६ अन्वये दि.३०.०४.२०१७ पर्यंत, शासन निर्णय, गृह विभाग दि.२५.०७.२०१७ अन्वये दि.३०.४.२०१८ पर्यंत, शासन निर्णय, गृह विभाग दि.१३.१२.२०१८ अन्वये दि.३०.०४.२०१९ पर्यंत, शासन निर्णय, गृह विभाग दि.१६.०८.२०१९ अन्वये दि.३०.१०.२०१९ पर्यंत, शासन निर्णय, गृह विभाग दि.२१.०१.२०२० अन्वये दि.३१.०१.२०२० पर्यंत, शासन निर्णय, गृह विभाग दि.०२.०७.२०२० अन्वये दि.३१.०७.२०२० पर्यंत, शासन निर्णय, गृह विभाग दि.२८.०४.२०२१ अन्वये दि.३१.०७.२०२१ पर्यंत, शासन निर्णय, गृह विभाग दि.३०.३.२०२२ अन्वये दि.३०.९.२०२२ पर्यंत, शासन निर्णय, गृह विभाग दि.२२.११.२०२२ अन्वये दि.३०.९.२०२३ व शासन निर्णय, गृह विभाग दि.१२.३.२०२४ अन्वये दि.३०.९.२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली आहे. मुंबई शहर

सीसीटीव्ही प्रकल्प कार्यान्वयन कालावधी दरम्यान शासन व पोलीस प्रशासन यांना तांत्रिक सहाय्य करण्यासाठी सल्लागारांची आवश्यकता आहे. त्यानुषंगाने दि.१३.२.२०२५ रोजीच्या उच्च स्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या बैठकीमध्ये मे. पीडब्ल्यूसी कंपनीला मुंबई सीसीटीव्ही प्रकल्पासाठी सल्लागार म्हणून मुदतवाढ देण्यास मान्यता देण्यात आली आहे. अपर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखाली उच्च स्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या दि.१३.२.२०२५ रोजीच्या बैठकीमध्ये The HPC approved the extension of the project management consultancy services 1st October 2024 to 30th September 2025 along with additional one Senior Consultant from the Date of the approval of the DPR of Phase-3 असा निर्णय घेण्यात आला त्यानुसार शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय** :

अ.मु.स. (गृह) यांच्या अध्यक्षतेखाली उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या दि.१३.२.२०२५ रोजीच्या बैठकीतील निर्णयानुसार प्रकल्प सल्लागारांना मुदतवाढ देण्याचे आदेश निर्गमित करण्याची बाब विचाराधिन होती. त्यानुसार मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पाच्या देखरेखीसाठी प्रकल्प सल्लागार म्हणून मे. प्राईस वॉटर हाऊस कुपर प्रा. लि., या कंपनीच्या दोन वरिष्ठ सल्लागारास व एक सल्लागारास पूर्णवेळ तत्वावर दि.१.१०.२०२४ ते दि.३०.०९.२०२५ पर्यंत तसेच एक वरिष्ठ सल्लागारास पूर्णवेळ तत्वावर फेज-३ चा (DPR) सविस्तर प्रकल्प अहवालास उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीची मान्यता प्राप्त झाल्याच्या तारखेपासून दि.३०.०९.२०२५ पर्यंत माहिती तंत्रज्ञान विभागाच्या उक्त नमूद दि.५.१०.२०२३ रोजीच्या शासन निर्णयास अनुलक्षून मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. उपरोक्त सल्लागारांना देण्यात येणारे मानधन व इतर भत्ते माहिती व तंत्रज्ञान विभागाच्या संदर्भ क्रमांक ६ येथे नमुद दि. ५.१०.२०२३ रोजीच्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार देय राहील तथापि माहिती व तंत्रज्ञान विभागाने सल्लागारांच्या मानधनासंदर्भात भविष्यात काही सुधारणा केल्यास सदर सुधारणा उपरोक्त सल्लागारांना लागू राहतील. तसेच त्यासाठी माहिती व तंत्रज्ञान विभागाने सदर कंपनीची नेमणुक (Empanelment) करणे आवश्यक राहील.

३. सर्व सल्लागारांना देण्यात येणारे मानधन हे दरमहा प्रती व्यक्ती (Man-Month) तत्वानुसार असेल. सर्व सल्लागारांचे दरमहा देयके शासनास सादर करतांना सल्लागारांनी महिन्याच्या कालावधीत केलेल्या कामाचा तपशील / अहवाल शासनास सादर करणे आवश्यक आहे.

४. मुंबई सीसीटीव्ही प्रकल्पासाठी नेमण्यात आलेल्या सल्लागारांना मानधन देण्यासाठी येणारा खर्च पोलीस आयुक्त, मुंबई यांच्या अधिनस्त असलेल्या “मागणी क्र.बी-१०, ४०५५ - पोलीस यावरील भांडवली

खर्च, ८०० इतर खर्च, (००) (०९) सीसीटीव्ही यंत्रणा बसविणे (४०५५ ०२२३) या अंतर्गत १३- कार्यालयीन खर्च" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो त्या-त्या वित्तीय वर्षासाठी उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३२६१६३६२४६०२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

RAJENDRA TANAJI BHALWANE

Digitally signed by RAJENDRA TANAJI BHALWANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=38d121bf4a170d16dacf98520f0ac44551976931d2758148cc aa24d1fb27b9df, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BADFC0DAA40CC485400AAD9CEABCD514095659A6C DFAC856815518DCD188C23A, cn=RAJENDRA TANAJI BHALWANE
Date: 2025.03.26 16:37:28 +05'30'

**(रा.ता.भालवणे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान, मंत्रालय, मुंबई.
७. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
११. निवडनस्ती, पोल-३.